**दि.१.४.२००८ पर्यंत असलेल्या रोहयोच्या अपूर्ण कामाबाबत.. ..**

महाराष्ट्र शासन
नियोजन विभाग
शासन निर्णय,नियोजन विभाग,क्रमांक -मग्रारोहयो-२००८/प्र.क्र.२८/रोहयो-६,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक - २४ जुलै, २०१०.

पहा : १) शासन पत्र क्रमांक-मग्रारोहयो-२००८/प्र.क्र.३ /रोहयो-१०, दिनांक ३१ मार्च, २००८.
२) शासन परिपत्रक क्र.रोहयो २००८/प्र.क्र.२८/रोहयो-६, दिनांक १० जून, २००८.
३) शासन पत्र क्रमांक-मग्रारोहयो-२००८/प्र.क्र.२८/रोहयो-६, दिनांक ५ जानेवारी,२००९.
४) शासन पत्र क्रमांक-मग्रारोहयो-२००८/प्र.क्र.२८/रोहयो-६, दिनांक ९ फेब्रुवारी,२००९
५) शासन पत्र क्रमांक-मग्रारोहयो-२००८/प्र.क्र.२८/रोहयो-६, दिनांक: ३० जून, २००९.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राष्ट्रीय रोजगार हमी अधिनियम,२००५ अंतर्गत सुरु झालेल्या महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजना दिनांक १ एप्रिल, २००८ पासून सर्व जिल्हयात सुरु झाली आहे. संदर्भाधीन पत्रान्वये दिनांक १.४.२००८ रोजी रोहयोमध्ये अपूर्ण कामे मग्रारोहयोमध्ये हस्तांतरीत करण्याबाबतच्या सूचना दिलेल्या आहेत व त्यानुषंगाने अपूर्ण कामांची यादी पाठविण्याविषयी सर्व जिल्हाधिकारी यांना सूचना देण्यात आल्या होत्या. प्राप्त झालेल्या माहितीनुसार रोहयोखाली मग्रारोहयो अंतर्गत हस्तांतरीत करता येत नाहीत असे जिल्हाधिका-यांनी अभ्यास करुन निष्कर्ष काढल्यावर त्या संदर्भात रोहयोखाली अपूर्ण कामांविषयी करावयाच्या कार्यवाहीबाबत शासन पुढील आदेश देत आहे.

**शासन निर्णय :**

रोहयोखाली मग्रारोहयो सुरु होण्यापूर्वी जी अपूर्ण कामे होती त्यापैकी जी कामे मग्ररोहयोखाली हस्तांतर होऊ शकली नाही याची यादी सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ नुसार ८ जिल्हाधिका-यांकडून अंतिमरित्या प्राप्त झाली आहे. त्यानुसार जिल्हावार माहिती पाहिली असता राज्यात एकूण ७०३ रस्ते व १९२६ तलाव अपूर्ण आहेत. त्यानुसार रुपये १७२५८.९० लक्ष इतकी रक्कम अपूर्ण कामांकरिता लागणार आहे.

(बा.बा.नारायणकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

रोहयो अर्थसकंल्पिय मंजूर तरतूद, प्रशासकीय अनुषंगीक बाबी उदा. अंदाजपत्रके तयार करणे इ. लक्षात घेता तीन वर्षात अपूर्ण कामे पूर्ण करण्याचा कालबध्द् कार्यक्रम आखून ती कामे पूर्वीच्या रोहयो पध्द्तीनुसार पूर्ण करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार पुढील कार्यवाही करणात यावी.

१) जिल्हयामध्ये मंजूर अंदाजपत्रकानुसार अपूर्ण कामे पूर्ण करण्यासाठी लागणा-या एकूण खर्चाच्या ३३ टक्के खर्चाची कामे चालू आर्थिक वर्षात करता येतील. त्यानुसार जी एक तृतीयांश रक्कम येईल त्याच्या ५० टक्के रक्कम तलाव व ५० टक्के रक्कम रस्ते यांकरिता खर्च करण्याचे नियोजन करावे.

२) अशा पध्दतीने तीन वर्षाचा कालबध्द कार्यक्रम आखून त्याअंतर्गत कामाचे प्राधान्यक्रम ठरविण्यात यावे. उदा. रस्त्यांच्या कामाबाबत ज्या रस्त्यांच्या कामासाठी आमदार, खासदार अथवा अर्थसंकल्पिय निधीतून डांबरीकरणाकरिता लवकर निधी प्राप्त होणार आहे ते रस्ते प्राथम्यक्रमाने घेणे आवश्यक आहे. तसेच सदर रस्त्याचा प्राधान्यक्रम अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम यांच्या मागदर्शनाखाली ठरविण्यात यावा.

३) तलावांच्या बाबतीत अधिक्षक अभियंता, स्थानिक स्तर (ल.पा.) यांच्या मार्गदर्शनाखाली प्राधान्यक्रम निश्चित करण्यात यावा.

४) ही कामे मग्रारोहयो जिल्हयात सुरु होण्यापूर्वी कामे करीत असतांना जी विहित कार्यपध्दती प्रचलित होती त्याप्रमाणे करावी.

२. वरील आदेश हे फक्त ज्या जिल्हाधिका-यांकडून अपूर्ण कामांची यादी प्राप्त झालेली आहे व सोबत परिशिष्ट "अ" मध्ये दर्शविली आहे तेवढयाच कामांना लागू राहील.

३. सदर अपूर्ण कामे मग्रारोहयोअंतर्गत पूर्ण करता येणे शक्य नाही, अशी खात्री पटल्यानंतरच संबधित जिल्हाधिका-यांनी कार्यारंभ आदेश द्यावेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या WWW.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१००७२६१३४४४७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(बा.बा.नारायणकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. राज्यपालांचे सचिव,

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

४.सर्व मंत्री,राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

५.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य,

६. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,

७. सर्व विभागीय आयुक्त,

८. सर्व जिल्हाधिकारी,

९. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,

१०.उप सचिव, विधान मंडळ रोहयो समिती,(४० प्रती)

११. सर्व मंत्रालयीन विभाग,

१२. सचिव (रोहयो) यांचे स्वीय सहाय्यक

१३. विशेष कार्य अधिकारी (मग्रारोहयो) यांचे स्वीय सहाय्यक

१४. सर्व उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी ( रोहयो प्रभाग.)

१५. निवडनस्ती रोहयो-६.

(बा.बा.नारायणकर)

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

परिशिष्ट - "अ"

**शासन निर्णय, नियोजन विभाग, क्रमांक- मग्रारोहयो-२००८/ प्र.क्र. २८/रोहयो-६, दिनांक - २४ जुलै, २०१०. सोबतचे जोडपत्र.**

| विभाग | अ.क्र. | जिल्हा | पत्र क्रमांक | रस्ते कामांची संख्या | रस्त्यांच्या कामांची किंमत (रू. लक्ष) | तलांवाच्या कामांची संख्या | तलांवाच्या कामांची किंमत (रू. लक्ष) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| नाशिक विभाग | १ | नाशिक | क्र. कक्ष- ११/रोहयो-७/१५/२००९ दिनांक- १२/१/२००९. | ६६ | ४६२.७ | २०१ | १,४७३.३ |
| | २ | नंदुरबार | क्र. रोहयो/कावि/२९३/२००९ दिनांक-३/८/२००९ | ३० | ९५.८४ | ४१ | ७७.०३ |
| नागपूर विभाग | ३ | गोंदिया | क्र. रोहयो/तां/द.प./४४१/०९ दिनांक- ४/७/२००९ | नाही | नाही | ४३ | ७५३.५४ |
| | ४ | चंद्रपूर | क्र.कावि/कार्या-१४/रोहयो/टे-१/०९/३३५ दिनांक-२८/१०/२००९. | नाही | नाही | २ | २२.६९ |
| पुणे विभाग | ५ | सोलापूर | क्र. रोहयो/ कार्या-१३/ आर आर-४ आ दिनांक- १७/११/२००९ | १७१ | ८६३.७८ | २७२ | १,२१४.९१ |
| औरंगाबाद विभाग | ६ | औरंगाबाद | जा.क्र./२००९/ रोहयो/तांशा/कावि/७२६ दिनांक-३१/३/२००९ | १७ | १८४.०९ | नाही | नाही |
| | ७ | बीड | जा.क्र./२००९/विकाअ/रोहयो-तांत्रिक/ १०३९ दिनांक-३/७/२००९ | ३८५ | ३,३१५.२९ | १,३६२ | ८,५४८.५ |
| अमरावती विभाग | ८ | वाशिम | क्र. रोहयो/शाअ/प्र.क्र. ४ / २००९ दिनांक- २८/१०/२००९ | ३४ | १९९.३९ | ५ | ४७.८४ |
| **एकूण** | | | | **७०३** | **५,१२१.०९** | **१,९२६** | **१२,१३७.८१** |

(बा.बा. नारायणकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.